मराठी

# बालभारती

## इयत्ता पहिली • भाग दुसरा









खाली काही अक्षरांच्या आणि स्वरचिन्हांच्या पट्ट्या दिल्या आहेत. एकेका अक्षराला एकेक स्वरचिन्ह जोडा आणि तयार झालेली अक्षरे वाचा.



शासन मंजुरी क्रमांक - पापुमं/१०९७/१३६६४/१-भाषा/स.पु./दिनांक ७-२-१९९७




# मराठी
# बालभारती

## इयत्ता पहिली
## भाग दुसरा



नाव ____________________

शाळा ____________________

इयत्ता ____________ तुकडी ____________



महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ, पुणे



प्रथमावृत्ती : १९९७


सुधारित आवृत्ती : १९९९

चौथे पुनर्मुद्रण : २००४



मराठी भाषा समिती : प्राचार्य राम शेवाळकर, अध्यक्ष
पद्मश्री दया पवार, सदस्य
श्री. व. द. देसाई, सदस्य
श्री. ह. गं. नारलावार, सदस्य
श्रीमती रेणू दांडेकर, सदस्य
श्रीमती वर्षा सहस्रबुद्धे, सदस्य
श्री. माधव राजगुरू, सदस्य-सचिव

संयोजन प्रमुख : माधव राजगुरू, विशेषाधिकारी, मराठी विभाग,

सहायक : श्रीमती उषादेवी देशमुख, विषय सहायक मराठी

चित्रकार : श्री. चंद्रकांत तजबिजे

मुखपृष्ठ : श्री. मुकुंद तळवलकर

अक्षरजुळणी : मुद्रा विभाग, पाठ्यपुस्तक मंडळ,
'बालभारती', सेनापती बापट मार्ग, पुणे - ४११ ००४.

निर्मिती : श्री. प्रमोद शिरोडकर, मुख्य निर्मिती अधिकारी
श्री. कमळाकर आगास्कर, निर्मिती अधिकारी

कागद : ५८.५ × ८६ सेमी, ५७ जी.एस्.एम्., क्रीमवोव्ह

मुद्रणादेश : N/Tech/3/2004-05 (4,40,000)

मुद्रक : Coronation Printpack Pvt. Ltd., Sivakasi - 626 123.

प्रकाशक : श्री. रमेश द. धर्माधिकारी
नियंत्रक,
पाठ्यपुस्तक निर्मिती,
गोरेगाव, मुंबई - ४०० ०६२.

## प्रस्तावना

'क्षमताधिष्ठित प्राथमिक शिक्षण अभ्यासक्रम-१९९५' नुसार पाठ्यपुस्तक मंडळाने मराठी बालभारती, पहिली हे पाठ्यपुस्तक १९९७ साली प्रकाशित केले. 'सरस-२००१' या प्रकल्पांतर्गत या पुस्तकाची सुधारित आवृत्ती जून १९९९ मध्ये काढली; त्यावेळी झालेल्या निर्णयानुसार इयत्ता पहिलीच्या पाठ्यपुस्तकाची दोन भागांत विभागणी करण्यात आली. सुरुवातीस ही दोन भागांतील पुस्तके पुणे जिल्ह्याकरिता होती. या पुस्तकाच्या उपयुक्ततेबाबत सर्वेक्षण घेण्यात आले, तेव्हा विद्यार्थी, शिक्षक आणि पालक यांच्या दृष्टीने दोन भागांतील पुस्तके अधिक सोईची असल्याचे आढळून आले; त्यामुळे प्रथम टप्प्याटप्प्याने विभागनिहाय आणि नंतर संपूर्ण राज्यासाठी ही दोन भागांतील पुस्तके उपलब्ध करून देण्यात आली आहेत.

प्रकाशनपूर्व आणि प्रकाशनोत्तर अशा दोन समीक्षणामुळे इयत्ता पहिलीच्या पुस्तकाचे दोन्ही भाग अधिक निर्दोष आणि दर्जेदार झाले आहेत, अशी आमची धारणा आहे.

या पुस्तकाच्या पहिल्या भागाप्रमाणेच दुसऱ्या भागाचेही पालक, शिक्षक आणि विद्यार्थी या सर्वांकडून स्वागत होईल, अशी आशा आहे.

पुणे<br>
दिनांक : १ जानेवारी, २०००<br>
११ पौष, शके १९२१

(एन. के. राठोड)<br>
संचालक<br>
महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व<br>
अभ्यासक्रम संशोधन मंडळ, पुणे.

# क्षमताधिष्ठित अभ्यासक्रम आणि पाठ्यपुस्तके

गेल्या चाळीस-पन्नास वर्षांत शिक्षणाचा प्रसार खूप झाला; पण गुणवत्तेबाबत शाळा-शाळांमध्ये, प्रांता-प्रांतांमध्ये फरक पडला. गुणवत्तेबाबत उद्‌भवलेल्या या प्रश्नावर क्षमताधिष्ठित अध्ययन-अध्यापन हा एक उपाय आहे. प्राथमिक शिक्षण घेणाऱ्या प्रत्येक विद्यार्थ्याला काय यायला हवे, याचा विचार म्हणजेच अध्ययन क्षमतांचा विचार. यात असे अपेक्षित आहे, की विद्यार्थ्याने जास्तीत जास्त क्षमता प्राप्त केल्या पाहिजेत. विद्यार्थ्यांच्या वर्तनात अपेक्षित बदल दिसून आला, तर त्याने संबंधित विशिष्ट क्षमता प्राप्त केली असे म्हणता येईल; मात्र हा बदल टिकाऊ स्वरूपाचा असला पाहिजे. हे टिकाऊ स्वरूपाचे बदल घडवूनच प्राथमिक शिक्षणात गुणात्मक सुधारणा करता येईल.

अभ्यासक्रमाच्या (क्षमताधिष्ठित प्राथमिक शिक्षण अभ्यासक्रम-१९९५) विविध क्षेत्रांमध्ये क्षमतांच्या विकसनाचे जे टप्पे दर्शवलेले आहेत ते परस्परावलंबी आहेत, त्यातील संबंध लक्षात घेऊन पाठ्यपुस्तकाची श्रेणीबद्‌ध रचना करण्यात आलेली आहे; म्हणूनच प्रत्यक्ष अध्यापनाच्या वेळी पाठ्यपुस्तकातील क्रम तोच ठेवायचा आहे.

क्षमताधिष्ठित अध्यापन हा काही अध्यापनातील पूर्णतया नवीन प्रयोग किंवा नवीन सिद्‌धान्त नाही; परंतु आता अभ्यासक्रमात नमूद केलेल्या क्षमता, वर्गातील प्रत्येक विद्यार्थ्याला प्रभुत्व पातळीवर प्राप्त झाल्या पाहिजेत, यासाठी प्रयत्न करायचे आहेत. अपेक्षित कृती विद्यार्थ्याला अचूकतेने, सहजतेने आणि योग्य त्या गतीने करता आली, म्हणजे त्याने संबंधित क्षमतेची प्रभुत्वपातळी गाठली असे म्हणता येईल. पाठ्यपुस्तकाचा वापर क्षमतेवरील प्रभुत्वासाठी करायचा आहे. त्यासाठी

पाठ्यपुस्तकातील सामग्रीबरोबरच शिक्षकाने स्वत: तयार केलेले साहित्यही वापरणे अपेक्षित आहे.

शिक्षकांचा हेतू केवळ पाठ्यपुस्तक संपवणे असा असता कामा नये, वर्गातील सर्व विद्यार्थ्यांना विशिष्ट क्षमता प्राप्त करून देणे हा असावा. जरूर तेथे अध्यापनाचा वेग कमी-जास्त करून तसेच उजळणी, नवीन उपक्रम, विविध स्वाध्याय इत्यादींचा वापर करून साध्य करायचा आहे.

वर्गातील सर्व विद्यार्थी विशिष्ट क्षमतेकडे बरोबरीने जावेत, यासाठी पाठ्यपुस्तकात अनेक प्रकारचे स्वाध्याय, उपक्रम आणि कृती दिलेल्या आहेत. त्या कशा घ्यायच्या याच्या सूचनाही दिलेल्या आहेत. विद्यार्थी क्षमता संपादनाच्या कोणत्या टप्प्यावर आहेत आणि संपादन केलेली क्षमता टिकून आहे की नाही, याचे मूल्यमापन सातत्याने करायचे आहे. एखादी क्षमता प्राप्त झाली नाही किंवा टिकून राहिली नाही असे आढळल्यास उपचारात्मक उपक्रमांची सोय केली पाहिजे. पाठ्यपुस्तकात नमुना चाचणी प्रश्न दिले आहेत. त्या प्रश्नांचा तसेच त्या धर्तीवर तयार केलेल्या जास्तीच्या प्रश्नांचा शिक्षकांनी वापर करावा. क्षमताधिष्ठित अध्यापनाचा आणखी एक विशेष म्हणजे प्राप्त झालेल्या क्षमतेचा वापर विद्यार्थ्यांना बाह्य जगात करता येणे. मूल्यमापनात या उपयोजनाचाही समावेश शिक्षकाने केला पाहिजे.

विद्यार्थ्याला होणारी क्षमतेची प्राप्ती वैयक्तिक आहे; मात्र त्याने ती संपादन करण्याची प्रक्रिया सांघिक आहे. त्या स्वरूपाच्या अध्यापनातून गुणवत्तेमध्ये समानता येणे आणि अध्ययनात सांघिक भावना वाढणे असा दुहेरी फायदा होईल अशी अपेक्षा आहे.

# क्षमतांची यादी

| क्षेत्र | क्षमता क्र. | क्षमता |
|---|---|---|
| श्रवण | १.१.१ | सोपी, परिचित व आवडीची बडबडगीते, कविता व गोष्टी समजपूर्वक ऐकता येणे. |
| | १.१.२ | परिचित प्रसंगातील संभाषण व संवाद समजून ऐकता येणे. |
| | १.१.३ | परिचित (नेहमीच्या) प्रसंगात केलेली तोंडी विनंती व दिलेल्या सूचना समजणे. |
| भाषण/ संभाषण | २.१.१ | ऐकलेली साधी वाक्ये बिनचूकपणे म्हणता येणे. |
| | २.१.२ | योग्य कृती आणि अभिनय करून बडबड गीते, सोपी गाणी व कविता समूहात म्हणता येणे. |
| | २.१.३ | विचारलेल्या सोप्या प्रश्नांची उत्तरे देणे. |
| | २.१.४ | सोपे प्रश्न विचारता येणे. |
| वाचन | ३.१.१ | वाचनात पुन्हा पुन्हा येणारी मुळाक्षरे, बाराखडीतील अक्षरे तसेच सोपी जोडाक्षरे स्वतंत्रपणे किंवा शब्दात आल्यास ओळखता येणे. |
| | ३.१.२ | छापील व हस्तलिखित मोठी अक्षरे वाचता येणे. |
| | ३.१.३ | परिचित शब्द तसेच छोटी वाक्ये अर्थ समजून मोठ्याने वाचता येणे. |

| क्षेत्र | क्षमता क्र. | क्षमता |
|---|---|---|
| लेखन | ४.१.१ | वाचनात वारंवार येणारी मुळाक्षरे, बाराखडीतील अक्षरे तसेच सोपी जोडाक्षरे पाहून लिहिता येणे. |
| | ४.१.२ | अधिक वापरात असलेली मुळाक्षरे, बाराखडीतील अक्षरे तसेच सोपी जोडाक्षरे ऐकून लिहिता येणे. (श्रुतलेखन) |
| | ४.१.३ | सोपे परिचित शब्द आणि साधी वाक्ये स्वत:हून लिहिता येणे. |
| आकलन (ऐकून व वाचून) | ५.१.१ | तोंडी सांगितलेली माहिती पुन: सांगता येणे. |
| | ५.१.२ | ऐकलेल्या मजकुरावर आधारित प्रश्नांची उत्तरे देता येणे. |
| कार्यात्मक व्याकरण | ६.१.१ | समान अक्षराने शेवट होणारे शब्द ओळखता येणे. |
| स्वयंअध्ययन | ७.१.१ | शब्द, चित्रपट्ट्या, (सोप्या) चित्रकोशाचा उपयोग करता येणे. |
| भाषा-व्यवहारात उपयोग | ८.१.१ | लहान किंवा मोठ्या आणि समवयस्क व्यक्तींशी बोलताना उचित शब्दांचा वापर करता येणे. |
| शब्दसंपत्ती | ९.१.१ | सुमारे १५०० शब्दांचे आकलन होणे. |

## शिक्षक आणि पालकांसाठी

मराठी बालभारती इयत्ता पहिली, पुस्तक पहिले यात मराठीतील सर्व मुळाक्षरांची ओळख करून दिली आहे. स्वर आणि मुळाक्षरांचे गट आणि त्यांचा क्रमही लावून दिला आहे. तसेच स्वरचिन्हांचाही परिचय करून दिला आहे. दोन किंवा तीन अक्षरांनी बनलेले सोपे शब्द आणि लहान लहान वाक्ये आता मुलांना वाचता येतात.

मराठी बालभारती इयत्ता पहिली, पुस्तक दुसरे यामध्ये प्रथम १ ते ८ या पाठांमध्ये सर्व स्वरचिन्हांचा क्रमाने परिचय करून दिला आहे. हे सर्व पाठ जोडाक्षर विरहित आहेत. या पाठानंतर तिसरी आणि पुस्तकाच्या शेवटी चौथी चाचणी दिलेली आहे. नवव्या पाठापासून हळूहळू जोडाक्षरांचा परिचय करून दिला आहे. सुरुवातीच्या पाठांची लांबी कमी ठेवली आहे. रंगीत चित्रांसह मुलांच्या भावविश्वातील आणि मुलांना आवडतील अशा गोष्टी, गाणी यांचा यात समावेश केलेला आहे. वर्षाच्या अखेरीस मुलांना वाचन व लेखन यावे आणि त्याचबरोबर अभ्यासक्रमातील निर्धारित इतर क्षमताही याव्यात, ही अपेक्षा आहे.

प्रत्येक पाठाखाली व पाठातील स्वाध्यायांना दिलेले क्रमांक अभ्यासक्रमातील क्षमतांचे आहेत. क्षमतांची यादी पुस्तकात दिली आहे. ती पालकांनी समजून घ्यावी.

# अनुक्रमणिका

'व' या घरात व पासून सुरू होणारे शब्द राहतात. 'ब' या घरात ब पासून सुरू होणारे शब्द राहतात. 'क' या घरात क पासून सुरू होणारे शब्द राहतात. वाट चुकलेले शब्द पाहा. त्यांना योग्य घराकडे न्या. रिकाम्या जागेत तुम्ही शब्द लिहा. त्यांचं घर शोधा.



# १. माझा हात



दादा : माझा हात, माझा हात.
ताई : माझा हात, माझा हात.
दादा : दात घासायला माझा हात.
खाऊ खायला माझा हात.





ताई : माझा हात.
दादा : माझा हात.
ताई : दार उघडायला माझा हात.
दादा : कचरा काढायला, माझा हात.



दादा : माझा हात.
ताई : माझा हात.
दादा ताई : काम करायला माझा हात.
मदत करायला माझा हात.
माझा हात, माझा हात.

| | |
|---|---|
| म + ा = मा | ल + ा = ला |
| ख + ा = खा | ड + ा = डा |

क्रमांक १ ते ८ हे वाचनाचे सरावपाठ आहेत. यात ा, ि, ी, ु, ू, े, ै, ो, ौ, ं ही स्वरचिन्हे क्रमाने दिलेली आहेत.

१.१.२, २.१.१, २.१.२, २.१.३, ३.१.३, ३.१.२, ३.१.१, ४.१.१, ५.१.२, ९.१.१, ४.१.३

## स्वाध्याय

1. जोड्या जुळवा. (३.१.३, ५.१.२)

दात दार खाऊ कचरा

काढा घासा उघडा खा

2. 'काना'/'आकार' ('ा') गिरवा. शब्द वाचा. पाटीवर लिहा. (३.१.३, ४.१.१)

 पाय  नाक  कान

3. अक्षरे जुळवून शब्द तयार करा. लिहा. (४.१.३, ९.१.१)

राकच .................. टाखरा .................. ईसफा ..................

4. वाचा. (३.१.३)

भाऊ भात डबा घास

खार घार ससा मासा

5. हात, पाय, तोंड, नाक, डोळे, कान यांचा उपयोग एकेका वाक्यात सांगा. (२.१.३)

6. शिक्षकाने पुढील कृतींचा अभिनय करून दाखववावा. मुलांनी त्या कृती ओळखाव्या. (२.१.३)

लिहिणे, दात घासणे, पोळी लाटणे, केर काढणे, खाणे

7. वाचा. लिहा. (३.१.३, ४.१.१)

दार उघडा. काम करा.

..................................................

..................................................

कचरा काढा. मदत करा.

..................................................

..................................................

# २. ताजी भाजी

भाजी आणली. भाजी आणली.
पापडी आणली. मिरची आणली.
पालक आणि कारली आणली.
आजी ग आजी कर ना भाजी.
ताजी ताजी हिरवी भाजी.
खायला छान ताजी भाजी.



| | |
|---|---|
| ह + ि = हि | ण + ि = णि |
| ज + ी = जी | ड + ी = डी |

२.१.१, २.१.३, ३.१.१, ३.१.२, ३.१.३, ४.१.१, ५.१.२, ९.१.१

## स्वाध्याय

- वाचा. (३.१.३)

**भाजी आणली - पट पट पट**
**भाजी धुतली - खस खस खस**
**भाजी चिरली - चर चर चर**
**भाजी शिजली - रट रट रट**
**खाऊन टाकली - चट चट चट**

- 'वेलांटी'/'इ'कार ('ि') गिरवा. शब्द वाचा. पाटीवर लिहा. (३.१.३, ४.१.१)



**निळी**
**पिशवी**



**पिवळा**
**दिवा**

- 'वेलांटी'/'ई'कार ('ी') गिरवा. शब्द वाचा. पाटीवर लिहा. (३.१.३, ४.१.१)



**काळी**
**पाटी**



**हिरवी**
**भाजी**

- वाचा. (३.१.३)

**आजी, आई, ताई, काकी, मामी, मावशी**
**खिडकी, खिळा, चिमणी, टिकली**

- खालीलपैकी पालेभाजी कोणती व फळभाजी कोणती ते सांगा. (५.१.२)

**कारली करडई काकडी मिरची पालक**

- पुढील मुद्द्यांना धरून मुलांना बोलते करावे. (२.१.३)
  - आवडती भाजी, नावडती भाजी
  - भाज्यांची नावे, रंग
  - भाजी बाजार, भाजीचे दुकान
  - ताजी भाजी

# ३. फुगा फुटला

मधूला सापडला फुगा. हिरवा पिवळा निळा फुगा. मधू फुगा हातात धरून धावू लागला.



बघता बघता फुगा हातातून सुटला. वारा वाहू लागला आणि फुगा हळूहळू



२.१.१, ३.१.१, ३.१.२, ३.१.३, ४.१.१, ५.१.२, ९.१.१

वर जाऊन एका झाडावर अडकला. तिकडून एक वानर आला. फुगा हातात धरून दाबला.



फुगा फटकन फुटला. वानर घाबरून धूम पळाला. मधू खुदूखुदू हसू लागला.



| | | | |
|---|---|---|---|
| स + ु = सु | फ + ु = फु | व + ू = वू | ड + ू = डू |

## स्वाध्याय

- सांगा. (५.१.२)

(१) फुगा कोणाला सापडला ? (२) फुगा कोणत्या रंगांचा होता ? (३) फुगा वरवर का जाऊ लागला ? (४) फुगा कोठे अडकला ? (५) फुगा का फुटला ? (६) मधू का हसला ?

- कसा ते सांगा. (५.१.२)

(खुदूखुदू, धूम, हळूहळू, फटकन यातील शब्द वापरून)

(अ) फुगा वर जाऊ लागला. (ब) फुगा फुटला. (क) वानर पळाला. (ड) मधू हसू लागला.

- 'उ'कार ('ु', 'ू') गिरवा. शब्द वाचा. पाटीवर लिहा. (३.१.३, ४.१.१)

 फुगा  बाहुली  फूल

- वाचा. (३.१.३)

सुधा वसुधा नूतन कुसुम मधुकर पारू तुकाराम रघू माधुरी विठू अरुण मारुती

- चौकटीतील शब्द वापरून मोकळ्या जागी योग्य शब्द लिहा. (३.१.३, ५.१.२)

| | |
|---|---|
| मधूला फुगा .................... | अडकला. |
| फुगा हातातून .................... | फुटला. |
| फुगा झाडावर जाऊन .................... | पळाला. |
| तिकडून एक वानर .................... | सापडला. |
| फुगा हातात धरून .................... | दाबला. |
| फुगा ........... वानर घाबरून ........... | आला. |
| | सुटला. |

# ४. माझा देश



हा माझा भारत देश.
छान छान माझा देश.
देशात गावे आहेत.
गावात माणसे आहेत.
गावाजवळ नदी आहे.
नदीला पाणीच पाणी आहे.
देशात शेतेच शेते आहेत.
शेतात पिकेच पिके आहेत.
गावा-गावात शाळा आहे.
शाळेत मुलेच मुले आहेत.
माझा देश छान आहे.
भारत माझा देश आहे.

| | | |
|---|---|---|
| द + े = दे | व + े = वे | ल + े = ले |
| ळ + े = ळे | श + े = शे | क + े = के |

२.१.१, २.१.३, ३.१.१, ३.१.२, ३.१.३, ४.१.१, ५.१.२, ९.१.१

## स्वाध्याय

- योग्य पर्याय निवडून सांगा. (२.१.३, ५.१.२)

भारत माझा .................. आहे. (गाव/देश)

नदीत .................. आहे. (पाणी/गाव)

शेतात .................. आहेत. (पिके/गावे)

शाळेत .................. आहेत. (पिके/मुले)

- 'मात्रा' ('े') गिरवा. शब्द वाचा. पाटीवर लिहा. (३.१.३, ४.१.१)






झाडे पाने फुले फळे

- 'मात्रा' ('े') देऊन लिहा. जसे - **फळ - फळे** (४.१.१)

पान - .................. झाड - .................. गाव - ..................

- वाचा. (३.१.३)

| | | |
|---|---|---|
| मुले | शेते | पिके |
| मुलेच मुले | शेतेच शेते | पिकेच पिके |
| खूप खूप मुले | खूप खूप शेते | खूप खूप पिके |

देशात गावे आहेत. गावात माणसे आहेत. गावात शाळा आहे. शाळेत मुले आहेत.

- वळणदार अक्षरांत लिहा. (४.१.१)

भारत माझा देश आहे.

..........................................................................

# ५. खेळ



मैदानात मुले जमली.
हैदर, शैला, मैना,
वैभव, भैरू आले.
वैशालीने शिटी वाजवली.



पळापळीचा खेळ सुरू झाला.
खेळात भैरू पहिला आला.

वैशालीने फुले आणली.
शैलाने सुई आणली.
मैनाने रीळ आणले.
वैभवने हार बनवला.
हैदरने भैरूला हार घातला.
भैरू खूश झाला.



| | | |
|---|---|---|
| म + ै = मै | ह + ै = है | श + ै = शै |

२.१.१, २.१.३, ३.१.१, ३.१.२, ३.१.३, ४.१.१, ४.१.३, ५.१.२, ९.१.१

## स्वाध्याय

- कोणी ते सांगा. लिहा. (४.१.३, ५.१.२)

**फुले आणली.** ..........................

**सुई आणली.** ..........................

**रीळ आणले.** ..........................

**हार बनवला** ..........................

**हार घातला.** ..........................

- दोन 'मात्रा' ('ै') गिरवा. शब्द वाचा. पाटीवर लिहा. (३.१.३, ४.१.१)





**पैसे**



**थैली**



**मैना**



**बैल**

- वाचा. (३.१.३)

**बैल पैज सैल लैला कैरी**

**वैरण सैनिक गैरहजर**

- मोकळ्या जागी वै, है, मै ही अक्षरे योग्य ठिकाणी लिहा. शब्द वाचा. (४.१.१, ३.१.३, ५.१.२, ९.१.१)

.......दर .......दान .......रण

- तुम्हाला माहीत असलेल्या खेळांची नावे सांगा. (२.१.३)

## ६. बोला बाई बोला



बोला बाई बोला
नका अशा रुसू
फुगले का गाल
फुटू दे हसू !



सोडा बाई सोडा
मनातला राग
बोबडिया बोलांची
फुलू दे बाग !



पुरे बाई पुरे
किती हा अबोला
इवलीशी मिठी
गळा आता घाला !

| | |
|---|---|
| ब + ो = बो | स + ो = सो |

१.१.१, २.१.१, २.१.२, २.१.३, ३.१.१, ३.१.२, ३.१.३, ४.१.१, ४.१.३, ९.१.१

## स्वाध्याय

■ वाचा. 'ओ'कार ('ो') असलेल्या अक्षरांखाली रेघ (–) ओढा. (३.१.३, ३.१.१)

**गोपाळ वाटोळा पाचोळा कोकिळा**

**झोपाळा आबोली रोपटे घोसाळे पोळपाट**

■ खालील अक्षरांपासून शब्द तयार करा. सांगा. पाटीवर लिहा. (४.१.३, १.१.१)

**रा प को त धो र फ ण गो ग मो रा रे ब खो**

■ जोड्या जुळवा. (२.१.३, ३.१.३)

| | | |
|---|---|---|
| **गोलगोल** | **गोडगोड** | **खोलखोल** |
| **विहीर** | **गोटी** | **साखर** |

■ 'ओ'कार ('ो') गिरवा. शब्द वाचा. पाटीवर लिहा. (३.१.३, ४.१.१)

 **टोपी**

 **धोतर**

 **कोट**

 **पागोटे**

■ वळणदार अक्षरांत लिहा. (४.१.१)

**बोला बाई बोला**

........................................................................

........................................................................

**किती हा अबोला**

........................................................................

........................................................................

# ७. वाढदिवस



गौरी आली, गौतम आला.
शौकत आला, सौरभ आला.

आज गौरवचा वाढदिवस.

गौरव गोड गोड खाऊ खा

गौरव मोठा हो

चला खेळ खेळू

खाऊ खा ना

मुले खूप खेळली.

असा साजरा झाला गौरवचा वाढदिवस !

| | | |
|---|---|---|
| ग + ौ = गौ | श + ौ = शौ | म + ौ = मौ |

२.१.१, ३.१.१, ३.१.२, ३.१.३, ४.१.१, ५.१.२, ९.१.१

## स्वाध्याय

■ सांगा. (५.१.२)

(१) वाढदिवस कोणाचा होता ? (२) वाढदिवसाला कोण कोण आले होते ? (३) गौरवला खायला काय दिले ? (४) 'मोठा हो' असे कोण बोलले ?

■ मोकळ्या जागी कंसातील योग्य शब्द लिहा. (३.१.३, ५.१.२, ४.१.१)

(गौरवला, मौज, सौरभ, गौरवचा, शौकत)

**आज ............ वाढदिवस होता. वाढदिवसाला मुले आली होती. गौरी, गौतम, ............ आणि ...................... आला होता. आईने ............... ओवाळले. मुलांनी खूप खूप ............ केली.**

■ 'औ'कार ('ौ') गिरवा. शब्द वाचा. पाटीवर लिहा. (३.१.३, ४.१.१)



**कौल**



**हौद**




**दौत**



**फौज**

■ वाचा. (३.१.३)

**औत चौक फौज हौस**

**दौलत कौतुक चौकोन सौदामिनी**

■ वाचा आणि वळणदार अक्षरांत लिहा. (३.१.३, ४.१.१)

**खेळ खेळू. गाणी गाऊ. मौज करू.**

..........................................................

..........................................................

# ८. गंमत जंमत



रंगपंचमी आली.
अंगणात मुले जमली.
बंडू आला. चंदू आला.
रंगू आली. चिंगी आली.
रंजना आली. अंजना आली.

चंदूने हिरवा रंग घेतला.
बंडूने जांभळा रंग टाकला.
चिंगीने, रंगूने तांबडा रंग उडवला.
रंजनाने, अंजनाने पिवळा रंग उडवला.

अंग रंगले. अंगण भिजले.
मुले रंगली. गंमत आली.

| | | | |
|---|---|---|---|
| अ + ं = अं | र + ं = रं | ब + ं = बं | प + ं = पं |
| च + ं = चं | ग + ं = गं | ज + ं = जं | त + ं = तं |

२.१.१, २.१.३, ३.१.१, ३.१.२, ३.१.३, ४.१.१, ४.१.२, ४.१.३, ५.१.२, ९.१.१

## स्वाध्याय

- सांगा. (५.१.२)

(१) अंगणात कोण कोण आले ? (२) चंदूने कोणता रंग घेतला ? (३) तांबडा रंग कोणी उडवला ? (४) पिवळा रंग कोणी उडवला ? (५) बंडूने कोणता रंग टाकला ?

- खालील रंगांची नावे वाचा. एकेका रंगाची एक-एक वस्तू सांगा. (३.१.३, २.१.३)

**हिरवा जांभळा तांबडा पिवळा काळा**

- शब्द नीट ऐका. पाटीवर लिहा. (४.१.२)

मंडप तांदूळ खांब चिंचोका नारिंगी बांगडी

- पहिल्या अक्षरावर अनुस्वार ('ं') देऊन शब्द वाचा. (३.१.३)

**माडी काडी सोड तोड**

- वाचा. (३.१.३)

**अंगत पंगत रंगत संगत जंगल पतंग**
**टांगा चिंच मुंगी थेंब पैंजण सोंग दौंड**

- वळणदार अक्षरांत लिहा. (४.१.१)

**रंगपंचमी आली. अंग रंगले. अंगण भिजले.**

..........................................................

..........................................................

**मुले रंगली. गंमत आली.**

..........................................................

..........................................................

- तुमच्या आवडीची नावे लिहा. (४.१.३)



............ 

............



............

............

## नमुना चाचणी तिसरी

**(एकेका क्षमतेसाठी किमान पाच प्रश्न विचारावेत.)**

- **तोंडी** (२.१.३)
  - हाताने करायची तीन कामे सांगा.
  - दोन हिरव्या भाज्यांची नावे सांगा.
  - आपल्या गावाचे नाव सांगा.
  - आपल्या देशाचे नाव सांगा.
  - हार बनवण्यासाठी कोणकोणत्या वस्तू लागतात ?
  - रंगपंचमीच्या दिवशी तुम्ही काय काय करता ?

- **पुढील वाक्ये ऐका. ती दुरुस्त करून सांगा.** (५.१.२)

  मी कानाने पाहतो.

  मी डोळ्याने बोलतो.

  मी तोंडाने ऐकतो.

- **'म' या अक्षराने शेवट होणारे तीन शब्द सांगा.** (६.१.१)

- **'बोला बाई बोला' ही कविता म्हणून दाखवा.** (२.१.२)

- **वाचा.** (३.१.३)

  काकांनी काल कागद कापला.

  हिरवी मिरची तिखट असते.

  आजोबांनी गौरवचे कौतुक केले.

  फुगेवाला खूप खूप फुगे घेऊन आला.

  चंदूने कैरी आणली. चिंगीने मीठ आणले.

  मीठ लावून कैरी खाताना मजा आली.

- **वाचा. करून दाखवा.** (मुलाने स्वतः मदतीशिवाय वाचावे.) (३.१.३)

  (१) तीनदा उडी मारा.

  (२) दोनदा टाळी वाजवा.

  (३) हात गालावर ठेवा.

  (४) खूप हसा.

  (५) डोळे मिटा.

खादीफलकावर चित्रे लावली आहेत. चित्रांतील वस्तूंची नावे टेबलावर ठेवलेल्या शब्दपट्ट्यांमधून शोधा. वस्तूच्या चित्राखाली तिच्या नावाची शब्दपट्टी लावा. (३.१.३)





.................. ..................

.................. ..................





.................. ..................

.................. ..................

(शिक्षकांनी अशी आणखी चित्रे व शब्दपट्ट्या तयार करून घ्याव्यात.)

वाचा. (३.१.३)

किति दिसते ही, कपिला गोजिरवाणी
ही खाते चारा पाणी
किति मऊ मऊ हे अंग लागते हाता
मारीना कोणा लाथा
जरि काळी ही, दूध पांढरे देई
लागते गोड ते ताई

लिहा. (४.१.१)

# भारत माझा देश आहे.

..................................................................

..................................................................

# ९. मोत्याची शेपटी

एकदा मोती खेळत होता.
खेळता खेळता
त्याने वळून पाहिले.
त्याला आपली
शेपटी दिसली.
त्याला वाटले,
शेपटी दातात पकडावी.
तो शेपटीमागे पळत सुटला.



खूप पळाला, खूप पळाला.
मागे पळाला, पुढे पळाला.
गरगर पळाला, भरभर पळाला.
घरात पळाला, बागेत पळाला.

तो पळाला की शेपटी पळे.
तो फिरला की शेपटी फिरे.
तो धावला की शेपटी धावे.
तो थांबला की शेपटी थांबे.





मोती खूप दमला, खूप थकला. पण त्याला शेपटी काही सापडली नाही. मग तो घरात जाऊन निजला !

तेव्हा शेपटी आपोआप त्याच्या तोंडात आली.

| | | |
|---|---|---|
| त् + य = त्य | व् + ह = व्ह | च् + य = च्य |

क्रमांक ९ ते १७ या पाठांमध्ये श्रवण, संभाषण, वाचन, लेखन या चारही क्षेत्रांचा विचार करायचा आहे. काही पाठांमधून जोडाक्षरे आली आहेत. त्यांच्या लेखनाचा सराव द्यावा. पाठावर आधारित प्रश्न विचारण्याआधी शिक्षकांनी पाठाचे प्रकट वाचन करावे. मुलांचे अनुवाचन घ्यावे. स्वतंत्रपणे वाचन करवून घ्यावे. मगच प्रश्न विचारावेत. पाठावर आधारित असे प्रश्न मुले विचारतील अशी व्यवस्था करावी. मुले ऐकून, पाहून किंवा स्वतंत्रपणे लिहू शकतील याकडेही लक्ष द्यावे.

१.१.१, २.१.१, ३.१.१, ३.१.२, ३.१.३, ४.१.१, ४.१.३, ५.१.२, ९.१.१

## स्वाध्याय

- सांगा. (५.१.२)

(१) खेळता खेळता मोतीला काय दिसले ? (२) मोती शेपटीमागे का पळत सुटला ? (३) मोती कुठे कुठे पळाला ? (४) मोती घरात जाऊन का निजला ?

- पाठातील शब्दांच्या आधारे वाक्ये पुरी करा. सांगा. (५.१.२)

(१) मोती पळाला की --- (२) मोती फिरला की ---

(३) मोती धावला की --- (४) मोती थांबला की ---

- गरगर, भरभर यांसारखे आणखी दोन शब्द सांगा. (५.१.२)

- मोकळ्या जागी कंसातील योग्य शब्द लिहा. (३.१.३, ५.१.२)

(जाऊन, पळत, खेळत)

**मोती .............. होता. मोती .............. सुटला.**

**मोती घरात .............. निजला.**

- खालील प्राणी ओळखा. त्यांना तुमच्या आवडीची नावे द्या. लिहा. (४.१.३)







..............................................................

..............................................................

# १०. चला सुटी झाली

चला, सुटी झाली आता खूप खूप खेळायचे

मी मोटारवाला । तुम्ही गावा चला
मी पैसे घेऊन बसवायचे
मी पो पो करीत पोचवायचे ॥



मी बनेन इंजिन । शिटी जोरात फुंकीन
तुम्ही सर्वांनी डब्बे बनायचे
तुम्ही ओळीत मागून चालायचे ॥



गुरुजी मी होणार । तुम्ही मुले शिकणार
मी ऐटीत वर्गात शिरायचे
तुम्ही एकदम उभे राहायचे ॥





मिळून करू नाटक । सोंगे सजवू झकास
मधे कुणीच नाही हसायचे
नाही नाही बरे भांडायचे ॥





| | | |
|---|---|---|
| म् + ह = म्ह | र् + व = र्व | र् + ग = र्ग |

१.१.१, १.१.२, २.१.१, २.१.२, २.१.३, ३.१.१, ३.१.२, ३.१.३, ४.१.१, ४.१.३, ५.१.२, ९.१.१

## स्वाध्याय

- सांगा. (५.१.२)

गाण्यातील मुले कोणकोणते खेळ खेळणार आहेत ?

- खालीलपैकी कोणीतरी एक बनून, तुम्ही काय कराल ते करून दाखवा. (२.१.३)

**आई आजोबा भाजीवाला**

**विदूषक पोलीस शेतकरी**

- आपल्यासाठी कोण काय करतात ते सांगा. (२.१.३)

**शेतकरी माळी सुतार गवंडी कुंभार**

**शिंपी लोहार सोनार पोलीस सैनिक**

- पाहा. लिहा. (४.१.१)

| | | | |
|---|---|---|---|
| **मोत्याने** | .................. | **आम्ही** | .................. |
| **मोत्याला** | .................. | **तुम्ही** | .................. |
| **मोत्याच्या** | .................. | **सर्व** | .................. |

- चित्रात काय दिसते ते लिहा. (४.१.३)

..........................................

..........................................

..........................................

..........................................

..........................................

..........................................

..........................................

..........................................

- हे गाणे वर्गात कृती करून चालीवर म्हणा. (२.१.२)

# ११. माझी शाळा



ही पाहा माझी शाळा.
शाळेभोवती बाग आहे.
बागेत झाडे आहेत.
झाडे फुला-फळांची.
बाग आम्हा मुलांची.
आम्ही झाडांना पाणी घालतो.
बागेतले गवत काढतो.
आम्ही साफसफाई करतो.
आम्ही शाळा सजवतो.












शाळेत आम्ही वाचतो, नाचतो,
गाणी गातो, खेळ खेळतो.
शाळा आमची आनंदाची,
मौजमजेची, अभ्यासाची.
बागेमध्ये फुलेच फुले.
तशी शाळेत आम्ही मुले.



| | |
|---|---|
| ध् + य = ध्य | भ् + य = भ्य |



२.१.१, २.१.३, २.१.४, ३.१.१, ३.१.२, ३.१.३, ४.१.१, ४.१.३, ५.१.२, ९.१.१

## स्वाध्याय

- तुम्ही काय कराल ते एका वाक्यात सांगा. (५.१.२)
  (१) शाळा चांगली दिसावी यासाठी –
  (२) शाळेच्या बागेसाठी –
- पुढे उत्तरे दिली आहेत. ती उत्तरे मिळतील असे प्रश्न विचारा. (२.१.४) (शिक्षकांनी असे प्रश्न मुलांकडून तयार करून घ्यावेत.)

| उत्तर | प्रश्न |
|---|---|
| जसे – शाळेभोवती बाग आहे. | शाळेभोवती काय आहे ? |
| शाळेभोवती बाग आहे. | बाग कोठे आहे ? |

बागेत फुलांची, फळांची झाडे आहेत.

मुले शाळेची साफसफाई करतात.

शाळेत मुले वाचतात, नाचतात, गातात, खेळतात.

- तुमच्या शाळेच्या अवतीभवती काय काय आहे ते सांगा. (२.१.३)
- लिहा. (४.१.३)

**आपले नाव -** ......................................

**शाळेचे नाव -** ......................................

**गावाचे नाव -** ......................................

- वळणदार अक्षरांत लिहा. (४.१.१)

**शाळा आमची मौजमजेची, अभ्यासाची.**

......................................

# १२. एक होता गणू

गणू नावाचा एक मुलगा होता.
तो लवकर उठत नसे.
दात घासत नसे. तोंड धूत नसे.
रोज अंघोळ करत नसे.
कपडे धूत नसे.



एकदा गणू बागेत खेळायला गेला.
तेथे मनी बसली होती.



गणू : मने, मने,
चल आपण खेळू.

मनी : मी नाही जा तुझ्याबरोबर खेळत.
तुझे तोंड साफ नाही !
मी माझे तोंड
कसे साफ करते बघ !



गणू पुढे गेला. त्याला भेटले एक कबुतर.

गणू : कबुतरा, कबुतरा,
चल आपण खेळू.





कबुतर : मी नाही जा तुझ्याबरोबर खेळत.
तुझे कपडे
किती मळके आहेत !
माझी पिसे बघ
किती स्वच्छ आहेत !





गणू आणखी पुढे गेला.
त्याला भेटला एक कोंबडा.

गणू : कोंबडेदादा, कोंबडेदादा,
चल आपण खेळू.

कोंबडा : मी नाही जा तुझ्यासारख्या आळशी
मुलाबरोबर खेळत. मी बघ किती
लवकर उठतो.

गणूबरोबर खेळायला कोणीच येईना.

मनी येईना,
कबुतर येईना,
कोंबडा पण येईना !

गणू पळत पळत घरी आला.

त्याने दात घासले,
तोंड धुतले. अंघोळ केली.
धुतलेले कपडे घालून
तो बागेत गेला.



मनी आली,
कबुतर आले,
कोंबडा आला.
सगळे मिळून गणूबरोबर
खेळू लागले.







| | | | |
|---|---|---|---|
| झ् + य = झ्य | ख् + य = ख्य | स् + व = स्व | च् + छ = च्छ |

१.१.१, १.१.२, २.१.१, ३.१.१, ३.१.२, ३.१.३, ४.१.३, ४.१.१, ५.१.२, ६.१.१, ९.१.१

## स्वाध्याय

- सांगा. (५.१.२)

(१) गणूबरोबर खेळायला कोण कोण तयार नव्हते ?

(२) कबूतर गणूबरोबर खेळायला का तयार नव्हते ?

(३) सगळेजण गणूबरोबर खेळायला केव्हा तयार झाले ?

- गणूला असे कोण म्हणाले ? सांगा. (५.१.२)

(१) 'मी माझे तोंड कसे साफ करते बघ !'

(२) 'मी नाही जा तुझ्यासारख्या आळशी मुलाबरोबर खेळत !'

- सांगा. (५.१.२)

(१) गणू तुम्हाला भेटला तर तुम्ही त्याला काय सांगाल ?

(२) आपण स्वच्छ राहिलो नाही तर काय होईल ?

- लिहा. जसे – **कोंबडा - कोंबडे** (४.१.१)

**ससा -** ............ , **चमचा -** ............ ,

**झरा -** ............ , **फळा -** ............

- समान अक्षराने शेवट होणारे दोन-दोन शब्द सांगा.

जसे – खेळ – वेळ, मेळ (६.१.१, ९.१.१)

दात, मूल, खार, वाट, पाणी, मासा, कावळा

- यात लपलेले प्राणी, पक्षी कोणते ? ओळखा. लिहा.

(४.१.३, ९.१.१)

जसे – **पट पट पट पट पो : पोपट**

**वळा वळा वळा वळा का :** ............

**कड कड कड कड मा :** ............

# १३. फुलपाखरू

फुलपाखरू
छान किती दिसते
फुलपाखरू ॥धृ.॥

या वेलीवर फुलांबरोबर
गोड किती हसते
फुलपाखरू ॥

पंख चिमुकले निळे जांभळे
हालवुनी झुलते
फुलपाखरू ॥

डोळे बारीक करिती लुकलुक
गोल मणी जणु ते
फुलपाखरू ॥

मी धरू जाता येई न हाता
दूरच ते उडते
फुलपाखरू ॥



१.१.१, २.१.१, २.१.२, २.१.३, ३.१.३, ४.१.१, ५.१.२, ९.१.१

## स्वाध्याय

- सांगा. (५.१.२)
  (१) फुलपाखराच्या पंखावर कोणकोणते रंग आहेत ?
  (२) गोल मणी कशाला म्हटले आहे ?
  (३) तुम्ही कोणकोणत्या रंगांची फुलपाखरे पाहिली आहेत ?
- बागेतील फुलपाखरे दुरून पाहा. काय दिसले ते वर्गात येऊन सांगा. (२.१.३)
- ठिपके जोडून चित्र पूर्ण करा. रंगवा.

- वाचा आणि वळणदार अक्षरांत लिहा. (३.१.३, ४.१.१)

**फुलपाखरू, छान किती दिसते ।**

# १४. तिळगूळ द्या, गोड बोला



टण् टण् टण्टण्टण्.
घंटा वाजली.
मधली सुटी झाली.
संगीता, नसीमा, ज्ञानू, निमा, जोसेफ
सगळे हात धुऊन आले.
डबे उघडले.



संगीता, निमा, ज्ञानू यांनी
गूळपोळी आणली होती.
ती सर्वांनी वाटून खाल्ली.
निमाने तिळगूळ आणला होता.
तिने सगळ्यांना तिळगूळ दिला.
निमा म्हणाली, 'आज संक्रांत.
तिळगूळ द्या, गोड बोला.'
नसीमाने विचारले, 'म्हणजे काय ?'

ज्ञानू म्हणाला,

‘म्हणजे भांडण विसरायचं. गोड बोलायचं.’

संगीताने सांगितले,

‘रुसवा सोडायचा.’

जोसेफ म्हणाला,

‘म्हणजे गोडीनं वागायचं.’

नसीमा म्हणाली,

‘मैत्री वाढवायची.’

‘आपण गोड बोलायचं, गोडीनं वागायचं’ असे म्हणत मुलांनी तिळगूळ खाल्ला.

टण् टण् टण्. घंटा झाली.



गुरुजी वर्गात आले. त्यांनीही मुलांना तिळगूळ दिला. गुरुजी म्हणाले, 'तिळगूळ घ्या, गोड बोला.' मुलांनी गुरुजींना नमस्कार केला. संक्रांतीचा सण असा साजरा झाला.




| | |
|---|---|
| द् + न + य = ज्ञ | 'ज्ञ' हे जोडाक्षर असले, तरी परंपरेने त्याला स्वतंत्र अक्षर मानून व्यंजनमालेत शेवटचे स्थान दिले आहे. |
| क् + र = क्र | स् + क = स्क |
| त् + र = त्र | ल् + ल = ल्ल |

१.१.२, २.१.१, ३.१.१, ३.१.२, ३.१.३, ४.१.३, ४.१.१, ५.१.२, ९.१.१

## स्वाध्याय

■ सांगा. (५.१.२)

(१) गूळपोळी कोणी कोणी आणली होती ? (२) निमाने काय आणले होते ? (३) तिळगूळ देताना काय म्हणतात ?

■ असे कोण म्हणाले ? एका शब्दात सांगा. लिहा. (५.१.२, ४.१.३)

(१) **'रुसवा सोडायचा.'** ...................

(२) **'भांडण विसरायचं.'** ...................

(३) **'मैत्री वाढवायची.'** ...................

(४) **'गोड बोलायचं,**
**गोडीनं वागायचं.'** ...................

■ चित्र पाहा. सण ओळखा. नाव लिहा. (४.१.३)





...................

■ खालील शब्द नीट पाहा. वाचा. लिहा. (३.१.३, ४.१.१)

**ज्ञानदेव संक्रांत मैत्री नमस्कार**

...................

# १५. एक होता ससा

एक होते जंगल.

जंगलात होता एक ससा.

आईचा तो लाडका होता.

एकदा काय झाले, अजित गेला जंगलात.

त्याला दिसला तो ससा. अजितच्या मनात आले, त्याला आपण घरी न्यावे.

अजित गेला सशाजवळ. सशाने अजितला विचारले, 'काय रे मुला, काय हवं तुला ?'

अजित म्हणाला, 'तूच हवास मला !'

ससा काही बोलला नाही.

अजित पुढे येऊन म्हणाला,

'येतोस ना रे माझ्या घरी ? तुला गोड गोड खाऊ देईन. निजायला मऊ मऊ गादी देईन. राहायला छोटंसं घर देईन. खेळायला बागेत घेऊन जाईन !'



ससा बोलला,

'गोड गोड खाऊ मला आवडत नाही.
गवताची गोडी कशालाच नाही.
मऊ मऊ गादी हवीय कुणाला ?
बिळातली माती आवडते मला.
खेळायला बाग हवी कशाला ?
रानातल्या सशांची सोबत मला.
मी तुझ्या घरी येणार नाही.
तिथे माझी आई असणार नाही.'

| | |
|---|---|
| न् + य = न्य | ल् + य = ल्य |

१.१.१, १.१.२, २.१.१, ३.१.१, ३.१.२, ३.१.३, ४.१.१, ५.१.२, ९.१.१

## स्वाध्याय

■ सांगा. (५.१.२)

(१) ससा कोठे राहात होता ? (२) ससा कोणाला दिसला ?
(३) ससा अजितबरोबर का गेला नाही ?

■ असे कोण, कोणाला म्हणाले ते सांगा. (५.१.२)

(१) 'तूच हवास मला !' (२) 'मी तुझ्या घरी येणार नाही.'

■ सशाला जे हवे त्यापुढे ☑ अशी खूण करा. नको त्यापुढे ☒ अशी खूण करा. (५.१.२)

| | | | |
|---|---|---|---|
| **गोड गोड खाऊ** | ☐ | **गवत** | ☐ |
| **बिळातली माती** | ☐ | **मऊ गादी** | ☐ |
| **खेळायला बाग** | ☐ | **सशांची सोबत** | ☐ |
| **अजितचे घर** | ☐ | **आई** | ☐ |

■ जोड्या जुळवा. (५.१.२)

| | | | |
|---|---|---|---|
| **मऊमऊ** | **गोडगोड** | **छोटंसं** | **बिळातली** |

| | | | |
|---|---|---|---|
| **खाऊ** | **माती** | **गादी** | **घर** |

■ वळणदार अक्षरांत लिहा. (४.१.१)

**माझी आई मला खूप आवडते.**

.....................................................................

.....................................................................

# १६. आनंदाने गाऊया



आनंदाने गाऊया
रिमझिम पाऊस झेलूया
झिमझिम झरती धारा ग
भिरभिर भिरार वारा ग

भिजून गेले अंग अंग
गाऊ, नाचू, होऊ दंग
झरझर धारा झेलूया
भरभर गिरक्या घेऊया

जमीन भिजते येतो गंध
झाडे, वेली, पक्षी धुंद
आनंदाने गाऊया
रिमझिम पाऊस झेलूया

'क्ष' हे जोडाक्षर असले, तरी परंपरेने त्याला व्यंजनमालेत 'ज्ञ'च्या आधीचे स्थान दिले आहे.

| | |
|---|---|
| क् + य = क्य | क् + श = क्ष |

१.१.१, २.१.१, २.१.२, ३.१.१, ३.१.२, ३.१.३, ४.१.१, ४.१.३, ५.१.२, ९.१.१

## स्वाध्याय

- सांगा. (५.१.२)

  (१) पावसाच्या पहिल्या दिवशी तुम्ही काय काय करता ?

  (२) पावसाची आणखी कोणती गाणी तुम्हाला म्हणता येतात ?

- हे गाणे तालावर म्हणा. (२.१.२)

- वाचा. लिहा. (३.१.३, ४.१.३)

**पाऊस कसा ?** ..............................

**धारा कशा ?** ..............................

**वारा कसा ?** ..............................

**झाडे, वेली, पक्षी कसे ?** ..............................

- ठिपके जोडा. चित्र पूर्ण करा.

- वाचा. (३.१.३)

**टपटप रिमझिम धोधो मुसळधार**

- वळणदार अक्षरांत लिहा. (४.१.१)

**आनंदाने गाऊया. आनंदाने नाचूया.**

..............................

..............................

# १७. रूप नको, गुण पाहा



गरुडाकडे एकदा सर्व
पक्षी जेवायला आले.
मोर आला.



कोंबडा आला.
हंस आला.



पोपट आला.
सारे पक्षी आले.



कोणाचा रंग सुंदर,
कोणाचे अंग सुंदर,
कोणाची चोच धारदार,
कोणाचे पंख ऐटदार.



..... पण कोकीळ आला नाही.

गरुड, पोपट आणि हंस सगळे मिळून कोकिळाकडे गेले.

गरुड म्हणाला, ‘कोकीळभाऊ चला.’

कोकीळ म्हणाला, ‘मी येत नाही. मला चांगला रंग नाही. चांगले रूप नाही. सगळे मला चिडवतील.’

गरुड म्हणाला, ‘असं दुसऱ्याबद्दल बोलणं किंवा चिडवणं बरोबर नाही. आपला रंग काही आपण ठरवत नाही.’

पोपट म्हणाला, ‘आणखी एक सांगू ? दिसण्यावरून कोणाला चिडवू नये. कोणाला काय येतं हे बघावं.’





मग कोकीळ तयार झाला. सर्वांबरोबर गेला.

जेवणानंतर त्याने गाणे म्हटले. त्याबरोबर सर्व पक्षी आनंदाने नाचू लागले.

मोर म्हणाला, 'वाहवा ! असं गाणं मला येत असतं तर किती छान झालं असतं !'

कोकिळाला फार बरे वाटले.

| | | |
|---|---|---|
| ऱ्+ य = ऱ्य | ण् + य = ण्य | द् + द = द्द |

.१.२, २.१.१, ३.१.१, ३.१.२, ३.१.३, ४.१.१, ५.१.२, ६.१.१, ९.१.१

## स्वाध्याय

■ सांगा. (५.१.२)

(१) गरुडाकडे कोणकोणते पक्षी जेवायला आले ?

(२) कोकीळ जेवायला का गेला नाही ?

(३) पोपटाने कोकिळाची समजूत कशी घातली ?

■ जोड्या जुळवा. (५.१.२)

| | | |
|---|---|---|
| मोर | धारदार | रंग |
| गरुड | मंजुळ | चोच |
| कोकीळ | ऐटदार | आवाज |
| हंस | शुभ्र | पिसारा |

■ धार शब्दाला 'दार' जोडून 'धारदार' शब्द झाला. यासारखे आणखी पाच शब्द सांगा. (५.१.२, ९.१.१, ६.१.१)

■ खालील शब्द नीट पाहा. ते तसेच लिहा. (४.१.१)

**पक्षी** **स्वच्छ**

# नमुना चाचणी चौथी

**(एकेका क्षमतेसाठी किमान पाच प्रश्न विचारावेत.)**

- **ऐका. लिहा.** (शिक्षकाने सांगावे. मुलांनी लिहावे.) (४.१.२)
  - (१) त्याने आम्हाला पत्र लिहिले.
  - (२) सर्वजण पाणी प्याले.
  - (३) तुझ्या पिशवीत माझ्या बांगड्या ठेवशील ?
  - (४) त्यांच्या हातातली पुस्तके घ्या.

- **पुढे उत्तरे दिली आहेत. ती उत्तरे मिळतील असे प्रश्न बनवा व लिहा.** (२.१.४)

| जसे — उत्तर | प्रश्न |
|---|---|
| अंगणात झाड आहे. | अंगणात काय आहे ? |
| झाड अंगणात आहे. | झाड कोठे आहे ? |
| (१) दप्तरात पाटी आहे. | .................................... |
| (२) पाटी दप्तरात आहे. | .................................... |
| (३) मीनाने लोणचे खाल्ले. | .................................... |
| (४) लोणचे मीनाने खाल्ले. | .................................... |

- **यात लपलेली भाजी कोणती ? ओळखा. लिहा.** (९.१.१)

  जसे — लक लक लक लक पा     पालक

  - (१) जर जर जर जर गा ....................
  - (२) कडी कडी कडी कडी का ....................
  - (३) टाटा टाटा टाटा टाटा ब ....................

- **अगं, अरे, अहो यांपैकी योग्य शब्द लिहून वाक्य पूर्ण करा.** (८.१.१)
  - (१) आजोबा मला गोष्ट सांगा ना !
  - (२) रमेश, तू कधी आलास ?
  - (३) मीना, ऊठ. शाळेची वेळ झाली.

■ पुढील चित्र पाहा. त्यात काय-काय दिसते ते लिहा. (४.१.३)



..............................

..............................

..............................

..............................

..............................

..............................

..............................

..............................

..............................

..............................

..............................

..............................

..............................

..............................

■ बरोबर असेल त्यापुढे ☑ अशी व चूक असेल त्यापुढे ☒ अशी खूण करा. (५.१.२)

(१) अमिताने केळीचे साल रस्त्यात टाकले. ☐

(२) सौरभने बाबांना घर आवरायला मदत केली. ☐

(३) सविताने थुंकी लावून पाटी पुसली. ☐

(४) विजयने मित्राचा भोवरा हिसकून घेतला. ☐

(५) कुमुदने खेळून झाल्यावर खेळणी जागेवर ठेवली. ☐

(६) भावाला खाऊ न देता सगळा खाऊ प्रतापने एकट्यानेच खाल्ला. ☐

# आपले राष्ट्रगीत

जनगणमन-अधिनायक जय हे
भारत-भाग्यविधाता ।
पंजाब सिन्धु गुजरात मराठा
द्राविड़ उत्कल बंग
विंध्य हिमाचल यमुना गंगा
उच्छल जलधि तरंग
तव शुभ नामे जागे, तव शुभ आशिस मागे
गाहे तव जय गाथा ।
जनगण मंगलदायक जय हे भारत-
भाग्यविधाता ।
जय हे, जय हे, जय हे, जय जय जय जय हे ॥



खालील प्रत्येक चित्रासमोर त्या त्या चित्रांच्या नावातील एकेक अक्षर दिले आहे. उरलेली अक्षरे लिहा आणि त्या शब्दांचा बाराखडीनुसार क्रम लावा.

| | |
|---|---|
|  | ____ ज |
|  | अं ____ |
|  | ____ री |
|  | ____ क्षा |
|  | बे ____ |
|  | ____ म |

